**प्रधानमंत्री पीक विमा योजना खरीप हंगाम सन २०१७ मध्ये वाढीव एक दिवसाच्या कालावधीत सहभाग घेतलेल्या व नुकसान भरपाईस पात्र ठरलेल्या शेतकऱ्यांना नुकसान भरपाईची रक्कम वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०१७ /प्र.क्र.०१/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २० जुलै, २०२०.

वाचा -

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो/२०१७प्र.क्र -११/अे, दि.२०.०६.२०१७
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१/११-अे, दि.२३.६.२०१७
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१/११- अे, दि.१.८.२०१७
४. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१/११- अे, दि.४.८.२०१७
५. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र./सां ८/ ४३४/२०१८, दि.१०.८.२०१८
६. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/ प्र.क्र-१, ११- अे, दि.०१.०२.२०१९
७. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१/११- अे, दि.८.५.२०१९
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र./सां८/५ ऑग./१६२६२/२०१९, दि.१०.०७.२०२०.

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप-२०१७ मध्ये तांत्रीक कारणास्तव ज्या बिगर कर्जदार शेतकऱ्यांना सदर योजनेत सहभागी होता आले नाही, त्यांचेकरिता राज्य शासनाच्या स्तरावर एक दिवसाची म्हणजेच दि.०५.०८.२०१७ पर्यंत सहभागी होण्यासाठी मुदतवाढ संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आली होती. सदर एक दिवसाच्या कालावधीत अर्ज भरलेल्या शेतकऱ्यांपैकी नुकसान भरपाईस पात्र ठरणाऱ्या शेतकऱ्यांचे दायीत्व राज्य शासनाने स्विकारले असून त्यास संदर्भ क्र.६ अन्वये शासनाने प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. तसेच संदर्भ क्र.७ च्या शासन निर्णयानुसार नुकसान भरपाईस पात्र ठरणाऱ्या ९५८४७ शेतकऱ्यांस निधी वितरीत करण्यात आला. आता, कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र.८ च्या पत्रान्वये केलेल्या प्रस्तावानुसार वरील वाढीव एक दिवसाच्या कालावधीत सहभाग घेतलेल्या शेतकऱ्यांपैकी नुकसान भरपाईसाठी अंतीमत: पात्र ठरलेल्या शेतकऱ्यांना नुकसान भरपाईची रक्कम अदा करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप-२०१७ मध्ये राज्य शासनाच्या स्तरावर एक दिवसाची म्हणजेच दि.०५.०८.२०१७ पर्यंत सहभागी होण्यासाठी मुदतवाढ देऊन या एक दिवसाच्या कालावधीत सहभागी होणाऱ्या शेतकऱ्यांपैकी नुकसान भरपाईस पात्र ठरणाऱ्या पात्र शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्यासाठी रु.५,५९,७१,८७२/- इतकी रक्कम संदर्भ क्र. ७ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

२. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) यांनी तीन महिन्यांचे आत शासनास सादर करावे.

३. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वर्षाकरीता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात येईल .

**मागणी क्र. डी -३**

**२४०१ - पीक संवर्धन, ३३ - अर्थसहाय्य**

**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य**

**राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर**

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ११६/२०२०/व्यय-१, दि.१५.७.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२०१७००३८६२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

BALASAHEB K RASKAR

Digitally signed by BALASAHEB K RASKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454ac5c700ad6e2a7ad0b3115db, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=2cf78d68ceeac33ca63c8a2f2b360ebf1c6ac77c6a1ad4c5bfb24951806af0a8, ou=AGRICULTURE DIARY AND FISHERTES DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=BALASAHEB K RASKAR
Date: 2020.07.20 17:13:21 +05'30'

**(बा. कि. रासकर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११.वित्त विभाग (व्यय-१/अर्थ.१३), मंत्रालय, मुंबई- ३२
१२.उप सचिव (११-अे/२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१३.कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४.विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३
१५.निवड नस्ती (कार्यासन ११-अे).